**केंद्र शासन व जागतिक बँक अर्थ सहाय्यित राष्ट्रीय भूजल व्यवस्थापन सुधार प्रकल्पाच्या (National Groundwater Management Improvement Program- NGMIP) अंमलबजावणीसाठी भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेस प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा म्हणून घोषित करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः आपना-०११७/प्र.क्र.२८/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई- ४०० ००१
तारीख: २५ मे, २०१७.

**वाचा :-**

१) **सचिव, जलसंधारण मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या दिनांक १४/०१/२०१७ रोजीच्या बैठकीतील सूचना.**

२) **संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांकः** जा.क्र.रा.भू.प्रा.क./का-१/मंत्रा.पत्र.व्य./प्र.क्र.२/५०/२०१५, दिनांक २१/०१/२०१७.

**प्रस्तावना :-**

भूजलाच्या अनियंत्रित उपशामुळे भूजल पातळीतील सततची घसरण व बाधित होत असलेली गुणवत्ता थांबविण्याकरिता मागणी व पुरवठा व्यवस्थापन प्रणालीच्या प्रभावी अंमलबजावणीद्वारे सहभागीय भूजल व्यवस्थापन सुधार प्रकल्पाची (National Groundwater Management Improvement Program- NGMIP) आखणी राष्ट्रीय पातळीवर करण्यात आली आहे.

राष्ट्रीय भूजल व्यवस्थापन सुधार प्रकल्पाकरिता केंद्र शासन व जागतिक बँक यांच्या मार्फत ५०:५० या प्रमाणात आर्थिक तरतूद उपलब्ध होणार असून सदर प्रकल्प राज्यात सन २०१६-१७ ते सन २०२१-२२ या सहा वर्षांच्या कालावधीसाठी राबविला जाणार आहे. हा प्रकल्प महाराष्ट्रासह राजस्थान, गुजरात, हरियाना, कर्नाटक, उत्तर प्रदेश व मध्यप्रदेश या सात राज्यांमध्ये राबविण्यात येणार असून प्रकल्पाचे लक्षकेंद्र अतिशोषित, शोषित आणि अंशत: शोषित पाणलोट क्षेत्रे/ तालुके असे आहे.

केंद्र शासन व जागतिक बँक यांनी सुचविल्यानुसार राष्ट्रीय भूजल व्यवस्थापन सुधार प्रकल्पाची राज्यस्तरावर यशस्वी अंमलबजावणी व सनियंत्रण करण्यासाठी राज्यपातळीवर प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

केंद्र शासन व जागतिक बँक पुरस्कृत राष्ट्रीय भूजल व्यवस्थापन सुधार प्रकल्पाची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी राज्य पातळीवर प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा म्हणून भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेस या शासन निर्णयान्वये नेमण्यात येत आहे. तसेच संचालनालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे येथे या प्रकल्पांतर्गत राज्यस्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या प्रकल्पाकरिता प्रकल्प संचालक म्हणून संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना नामनिर्देशित करण्यात येत आहे.

या प्रकल्पाचा विस्तृत अंमलबजावणी आराखडा (PIP) तयार करण्यासाठी प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकरिता आवश्यक अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा यंत्रणेकडील उपलब्ध मनुष्यबळामधून शासन मान्यतेने प्रतिनियुक्तीने भरता येतील.

प्रकल्पाचा अंमलबजावणी आराखडा तयार करणे तसेच प्रकल्पाच्या अंमलबजावणी करीता येणाऱ्या प्रशासकीय खर्चासाठी प्रकल्पाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीमधून आवश्यकतेनुसार निधी उपलब्ध करून देण्यात येईल.

या प्रकल्पाच्या कार्यान्वयनासाठी प्रकल्प व्यवस्थापन कक्षास (PIU) आवश्यक असलेल्या इतर अनुषंगिक पदांची निर्मिती विहित शासकीय प्रणालीचा अवलंब करून यथावकाश करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201705251256145128 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.05.25 13:15:14 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
२. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. प्रधान सचिव (पा.पु.व स्व.विभाग), गो.ते. रुग्णालय इमारत संकुल, मुंबई.
६. विभागीय आयुक्त (सर्व).
७. जिल्हाधिकारी (सर्व).
८. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व).
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
११. प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
१२. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
१३. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये.
१४. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५)